# एप्रिल फूल दिवस



एमिली केली

चित्र: सी.ए. नोबेन्स, मराठी: अश्विनी बर्वे




# एप्रिल फूल दिवस

एमिली केली

चित्र: सी.ए. नोबेन्स

मराठी: अश्विनी बर्वे




हे तुम्ही आजपर्यंत वाचलेले सगळ्यात खराब पुस्तक असेल, अगदी कंटाळा आणणारे, यातील चित्रं सुद्धा कुरूप आहेत.तुम्हाला पाहिजे तर हे पुस्तक तुम्ही आत्ताच खाली ठेवून देऊ शकतात..

पण एक मिनिट थांबा!
एप्रिल फुल!



तुम्हाला कोणी एप्रिलच्या पहिल्या दिवशीच कोणी मूर्ख बनवलं आहे का?

तर तुम्ही तसे एकटे नाही आहात. एप्रिलच्या पहिल्या तारखेला दुसऱ्याला मूर्ख करण्याची प्रथा शेकडो वर्षांपासून आहे.

त्यादिवशी थन्क्सगिविंग सारखी सुट्टी नसते, पण एप्रिल फूल हा दिवस प्रत्येक वर्षी अमेरिका, ग्रेट ब्रिटेन, कॅनडा, ऑस्ट्रेलिया आणि फ्रान्समध्ये साजरा केला जातो.

कोणाला नक्की माहीत नाही की एप्रिल फुल करणे कधी पासून सुरु झाले. काही लोकांचे म्हणणे आहे की हे रोमन काळापासून सुरु झाले होते.

आजपासून २००० वर्षाआधी. ते असे मानतात की त्याची सुरुवात प्रोसेरपीनाची रोमन कहाणीने झाली होती.



प्रोसेरपीनाच्या आईचे नाव सेरेस होते.

सेरेस एक देवी होती. ती धान्य आणि सुगीची देवता होती. एक दिवस प्रोसेरपीना फूलं वेचत होती. तेव्हा मृतांची देवता प्लूटोने तिला बघितलं.

प्लूटोला ती खूप सुंदर वाटत होती.

प्लूटोला तिला आपली राणी करायची इच्छा होती.

प्लूटोने प्रोसेरपीनाला पळवून नेण्याचे ठरवले.

प्लूटोने तिला मृतकोंच्या भूमीवर घेऊन आला. प्रोसेरपीनाला त्याच्याबरोबर जायची इच्छा नव्हती. तिला मृतकोंच्या भूमीवर राहण्याची इच्छा नव्हती.





सेरेसने मदतीसाठी प्रोसेरपीनाची हाक ऐकली. ती आपल्या मुलीला शोधण्यासाठी बाहेर पडली. पण तिचा ‘शोध’ हे एक मूर्खपणाचे काम होते. कारण सेरेस केवळ

प्रोसेरपीनाच्या आवाजाच्या मागे जाऊ शकत होती. ती मृतकांच्या भूमीवर जाऊ शकत नव्हती. प्लूटोच्या शिवाय कोणीही जिवंतलोकांच्या भूमीवरून मृत व्यक्तींच्या भूमीवर येऊ जाऊ शकत नव्हते. आज काही लोक म्हणतात की एप्रिल फुल करण्याची प्रथा या कहाणीपासून सुरु झाला. जसे प्लुटोने सेरेसला मूर्ख बनवले.

एप्रिल फूल दिवसाची सुरुवात कशी झाली त्याबद्दल अजून एक दंत कथा आहे, "गोथमचा समजदार माणूस ‘याची कहाणी..

१२०० च्या दशकात, जॉन इंग्लडचे राजा होते. एका वसंतात ते नॉटिंघमला जा त होते.

ते गोथमच्या गवताळ मैदानातून जाण्याची योजना तयार करत होते. त्या काळात अशी प्रथा होती की राजा ज्या कोणत्या मैदानावरून जाईल तो सार्वजनिक रस्ता होत असे. गोथमच्या लोकांना त्यांच्या गवताच्या मैदानाचा रस्ता व्हावा असे वाटत नव्हते. म्हणून त्यांनी जॉन राजाला त्यापासून दूर ठेवले.






त्यामुळे राजाला खूप राग आला. म्हणून त्याने एका अधिकाऱ्याला तिकडे पाठवले की लोक असे का वागले हे राजाला जाणून घ्यायचं होतं, जेव्हा लोकांना कळले की राजाचा अधिकारी येणार आहे. तेव्हा त्यांनी काय करायला पाहिजे? याचा विचार करण्यासाठी ते एकत्र जमले. जेव्हा राजाचा अधिकारी आला तेव्हा त्याला दिसले की

काही लोक तलावात एका माशाला बुडवण्याचा प्रयत्न करत होते.



इतर लोक आपल्या गाड्यांना गोठ्याच्या छपरावर खेचत होते. लोक म्हणाले की त्यांना आपले छत उन्हापासून वाचवायचे होते.



काही लोक पनीरचे तुकडे फादाव्रून खाली ढकलत होते. त्यांचे म्हणणे होते यामुळे पनीर सरळ नोटिंग होम च्या बाजारात पोहचेल.





दुसऱ्या लोकप्रिय समजुतीनुसार एप्रिल फूल डेची सुरुवात फ्रान्समध्ये झाली. १५६४ मध्ये, राजा चार्ल्स इलेव्हनने नवीन ग्रेगोरियन कॅलेंडर सादर केले. वापरण्याचा निर्णय घेतला. या कॅलेंडरमध्ये वर्षाचा पहिला दिवस १ एप्रिल पासून बदलून १ जानेवारी. त्या दिवसांत हळूहळू बातम्या पसरल्या.काही लोकांना हा बदल खूप दिवसांनी कळला. आणि इतर काहींना पहिला दिवस बदलायला अजिबात नको होते.

जेव्हा राजाच्या अधिकाऱ्याने हे सर्व पाहिले. तेव्हा त्याला हे लोक मूर्ख वाटले. त्याने राजाला सांगितले की त्यांना दंड करण्याचा त्रास घेऊ नका. काही लोकांचे म्हणणे आहे की तेव्हापासून एप्रिल फुला ची सुरुवात झाली.






काही लोकांनी नवीन वर्षाच्या दिवशी जुन्या परंपरा चालू ठेवल्या. ते मित्रांना भेटायला गेले. त्यांनी एकमेकांना भेटवस्तू दिल्या. पण ते चुकीच्या दिवशी साजरे करत होते! मग इतर लोक त्यांची चेष्टा करू लागले. काहीजण आजही १ एप्रिलला नववर्ष म्हणून साजरे करत आहे. शेवटी एप्रिल फूल दिवस फ्रान्समध्ये ही एक परंपरा बनली.

एप्रिल फूलचा दिवस कसा सुरू झाला याबद्दल अजून  एक गोष्ट आहे? फ्रान्समधील काही लोकांनी पाहिले की वसंत ऋतू मध्ये नद्यांमध्ये भरपूर मासे असतात. कारण त्यावेळी अंड्यातून छोटे मासे बाहेर येतात आणि त्यांना पकडणे सोपे होते. त्यांना सहजपणे गळ टाकून फसवता येत असे. फ्रेंच लोक लवकर ज्याला सहज फसवता येईल, त्याला "पॉइसन डी'एव्हरिल" म्हणू लागले. ज्याचा अर्थ “एप्रिलचा मासा” असा होतो.









फ्रान्समध्ये एप्रिल फूलची प्रथा खूप लोकप्रिय झाली होती. कोणीही १ एप्रिलला महत्वाचे काम सुरु करायला तयार नसत.

लोक मूर्ख  होण्यास घाबरत होते. पण नेपोलियन बोनापार्ट ने १ एप्रिलला दुसरे लग्न केले म्हणून त्याचे उपनाम "पोइसन डी'एवरिल" ठेवले गेले.

१७ 00च्या दशकात एप्रिल फुल साजरा करण्याची प्रथा ब्रिटनमध्ये खूप लोकप्रिय झाली होती. स्कॉटलैंडमध्ये एक लोकप्रिय पद्धत होती ज्यात लोकांना मूर्ख कामांसाठी पाठवले जाई. एखाद्या गरीब व्यक्तीला कोंबड्याचे दात किंवा कबुतराचे दूध शोधायला पाठवून मूर्ख बनवले जात असे. कारण कोंबड्यांना दात नव्हते. आणि कबुतर दूध देत नाही.





स्कॉटलैंडमध्ये एक लोकप्रिय मजा होती तिला

"गोकची शिकार“ म्हणत असत.

गोक एक कोकिळेसारखा पक्षी असतो.

चला २५० वर्षे मागे जाऊ, बघू या ती मजा

कशी काम करत होती.




ही १ एप्रिल १७३७ ची सकाळ आहे.

मिस्टर एंड्र्यूज, वाल्टर यंगला एक पत्र दिले गेले आणि म्हटले

"कृपया हे पत्र मिस्टर स्कॉटला

डंडी गल्लीत त्यांच्या घरी नेऊन दया.”

“पण ते तर शहराच्या बाहेर राहतात,” वाल्टरने म्हटले.

“मला माहीत आहे की त्यांचे घर खूप लांब आहे."

मिस्टर एंड्रयूजने म्हटले.

“पण हे एक महत्वाचे पत्र आहे.

मला कर्जाची गरज आहे, आणि मिस्टर स्कॉट

एक खूप श्रीमंत माणूस आहे.”

मग वाल्टर, डंडी गल्लीकडे निघाला. तिथे पोहचेपर्यंत तो थकला होता आणि त्याला भूक लागली होती. पण त्याने ते महत्वाचे पत्र पोहचवले.



मिस्टर स्कॉटने निरोप वाचला.

"ओह,  मला खेद वाटतो," त्यांनी म्हटले.

“मी मिस्टर एंड्र्यूजला पैसे उधार देऊ शकत नाही, पण मिस्टर ब्लैकबर्न ज़रूर देऊ शकतात.

ते याच रस्त्यावर पुढे एक मैल राहतात. हे पत्र त्यांच्याकडे नेऊन दया.“

बिचाऱ्या निरोप्याने परत चालणे सुरु केले. पत्रात मोठ्या अक्षरात लिहलेले होते. “आज एक एप्रिल आहे. एक मैल अजून चाल आणि गोकची शिकार कर.”





वॉल्टरला डंडी रस्त्यावर दुसरे घर सापडले नाही.शेवटी, तो आपल्या शहरात परतला. तेथे त्याने आपल्या सहकारी बघितले



ते त्याच्या येण्याची वाट पाहत होतो. सगळे शहरवासी हसतात. अर्थात, त्यात त्यांना खूप मजा आली, पण वॉल्टरला त्यांनी केलेली चेष्टा आवडली नाही.

तसेच १८५७ मध्ये लंडनमध्येअनेकांना फसवले गेले.त्या दिवसांत टॉवर ऑफ लंडनमध्ये तिथे प्राणीसंग्रहालय असायचे. वर्षातून एकदा प्राणिसंग्रहालयातील सिंहांना आंघोळ घालण्यात येई .सर्वांना ते दृश्य पहायचे असे. १ एप्रिल १८५७ रोजी त्या शोसाठी शेकडो लोकांनी तिकिटे खरेदी केली होती. पण जेव्हा ते टॉवर ऑफ लंडनवर पोहोचले. मग त्याला कळले की ते सगळे एप्रिल फूल झाले आहेत. एप्रिल फूलच्या दिवशी एक खोडकर व्यक्तीने त्यांना फसवून बनावट तिकिटे विकली होती.



नव्या जगात एप्रिल फूल बनवण्याची परंपरा सुरुवातीच्या काळात आलेल्या ब्रिटिशांबरोबर आली. मुलं अनेक प्रकारचे विनोद, खोडकरपणा करत असत. त्यांचा आवडता विनोद कोणाच्यातरी पाठीवर. "मला लाथ मार" किंवा "मला चिमटा काढा“ असे लिहण्याचा होता. ज्याच्या पाठीवर लिहलेले असेल ती व्यक्ती खूप गोंधळून जात असे, पण जी मुलं मस्ती करतात, त्यांना खूप मजा येई.



दुसरी युक्ती वितळलेल्या चॉकलेटची होती. वितळलेले चॉकलेट कापसाच्या तुकड्यांनी झाकणे.या ‘कॉटन कँडी’ मुळे अनेकांना फसवले गेले. काही लोक साखरेच्या डब्यात मीठ घालत किंवा काहीजण मिठात साखर घालत.







युनायटेड स्टेट्स मध्ये एक विनोद जो खूप लोकप्रिय झाला होता, तो असा होता.एक माणूस पर्सला दोरा बांधायचा, मग तो ती पर्स फुटपाथवर टाकून जायचा.

तो स्वतः त्या दोऱ्याचे टोक दुसऱ्या बाजूला धरून बसत असे. आणि तो लपून राहत असे. जेव्हा कोणी ती पर्स उचलायला वाक्स्त असत तेव्हा ती पर्स त्यांच्या हातातून निसटून जाई.

हा विनोद खूप प्रसिद्ध झाला. एक वर्षाची जुनी पर्स फुटपाथवर पडली होती, मात्र त्याला कोणी उचलले नाही. कारण कोणालाच एप्रिल फूल व्हायचे नव्हते.शेवटी एका धाडसी मुलाने त्याला उचलले. पर्समध्ये ८० डॉलर्स होते. कोणीतरी खरोखर त्याची पर्स गमावली त्या लहान मुलाला पर्स परत केल्याबद्दल बक्षीस मिळाले. यावेळी एप्रिल फूल हा विनोद नव्हता. ज्यांनी पर्स उचलली नाही त्या सर्वांनीते सगळे एप्रिल फूल झाले!






एप्रिल फूल्सच्या दिवशी काही प्राणीसंग्रहालयात माणसांपेक्षा प्राण्यांसाठी जास्त दूरध्वनी येतात.

खोटे संदेश बऱ्याच काळापासून लोकप्रिय आहेत. एकेकाळी कॅलिफोर्नियातील आठ सिनेट सदस्यांना त्यांच्या डेस्कवर एक संदेश आला. त्यात त्यांना ताबडतोब राज्यपाल कार्यालयात बोलावले होते. पण तिथे गेल्यावर त्या सगळ्यांना लाज वाटली कारण राज्यपालांनी अशी कोणतीही मिटिंग बोलावली नव्हती.






१९५९ मध्ये हवाईमध्ये रेडिओ डिस्क जॉकीने जोरदार खळबळ उडवली. हवाई नुकतेच नवीन राज्य बनले होते. डिस्क जॉकीने लोकांना सांगितलेकी त्यांचा गेल्या वर्षीचा कर परत केला जाईल. कल्पना करा लोक किती उत्तेजित झाले असतील!

एप्रिल फूल डेचा उद्देश विनोद करणे हा आहे. जेणेकरुन जे लोक एप्रिल फूल झाले त्यांनाही हसता येईल. त्याचे ध्येय खोटे आणि क्षुद्र असायला नको. त्यात गंमत नाही.अनेक शतके एप्रिल फूलबनवण्याची प्रथा चालू आहे. ती आजही लोकप्रिय आहेआणि येत्या काही वर्षांत लोक त्याचा आनंद घेतील. अनेक वर्षे लोक पुन्हा त्याच गंमती करतील. ज्यात आपण आज अडकलो आहोत.आणि यातील अनेक चाली सारख्याच आहेत. ज्यात शेकडो वर्षांपूर्वी लोक अडकले होते.






येत्या १ एप्रिलपासून सावधान.साखरेच्या डब्यात मीठ असल्यासआणि मीठात  साखर आढळल्यास आश्चर्यचकित होऊ नका. जर लोक तुम्हाला चिमटे काढू लागले, त्यामुळे तुमच्या पाठीवर काही लिहलेले आहे का ते पहा. फुटपाथवर पर्स दिसली तरमग तुम्ही ते उचलण्याची हिंमत कराल का?




जर तुम्ही एप्रिल फुल झालात तर अजिबात त्रासून आणि वैतागून जाऊ नका.